अपंग व्यक्ती (समान संधी), संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण अधिनियम १९९५ नुसार जलसंपदा विभागातील गट-अ व ब (राजपत्रित) पदांना अपंग आरक्षण लागू करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र. संकीर्ण १०१०/(६९/२०१०)/आ(संनि)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :-१३/०१/२०११

वाचा- (१) अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम,१९९५,
(२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-१०९८/प्र.क्र.१२/१६-अ, दि.२.५.१९९८
(३) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र. संकीर्ण १०९८/६९/(आ(संनि), दि.२४.८.९८,
(४) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग़, क्र. संकीर्ण १०९८/६९/आ.(संनि), दि.१८.२.९९
(५) शा. नि. सामान्य प्रशासन विभाग, क्र. अपंग-१००१/६१/प्र.क्र.३६/२००२/१६-अ, दि.१०.५.२००२.
(६) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र.संकीर्ण-१००३/(८२/२००३)/आ(संनि), दि.१३.५.२००४
(७) शासन पत्र सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्र.अपंग-२००५/प्र.क्र.५४३/सुधार-३, दि.२६ डिसेंबर, २००५
(८) शासन निर्णय, क्र. संकीर्ण-१००६/(१४/२००६)/आ(संनि), दि.२३/०६/२००८
(९) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. न्यायप्र२००९/प्र.क्र.५/सुधार-३ दि.३.८.२०१०

**प्रस्तावना :-**

जलसंपदा (पूर्वीच्या पाटबंधारे) विभागातर्गत अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ मधील तरतुदीनुसार गट-अ व गट-ब (राजपत्रित) मधील तांत्रिक पदांवर सरळसेवा भरतीसाठी अपंग प्रवर्गाकरिता आरक्षण लागू करण्यासाठी संदर्भाधिन अ.क्र.८ येथील शासन निर्णयान्वये दि.२३.६.२००८ रोजी आदेश निर्गमित करण्यात आला, तथापि, मा.उच्च न्यायालयात दाखल झालेली जनहित याचिका क्र.२२५/२००९ मध्ये मा.उच्च न्यायालयाने निर्देशित केल्यानुसार संदर्भ क्र.९ येथील सामाजिक

न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.३.८.२०१० च्या शासन निर्णयान्वये सूचित केल्यानुसार

खालीलप्रमाणे सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन अनुक्रमांक ८ येथील दि.२३.६.२००८ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन पुढीलप्रमाणे सुधारीत आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

२. अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ मधील तरतुदीनुसार केंद्र शासनाने ज्या यादीन्वये त्यांच्या अखत्यारीतील आस्थापनेवरील जी पदे अपंग व्यक्तीकरीता आरक्षण देण्यासाठी निश्चित केलेली आहेत. त्या यादीशी तुलना करुन जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील गट-अ व गट-ब संवर्गातील सरळसेवेने भरावयाच्या पदांसाठी (केंद्र शासनाच्या यादीतील समान पदे विचारात घेऊन) सोबत जोडलेल्या परिशिष्ट अ मधील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे अपंगासाठी पदे सुनिश्चित करण्यात येत आहेत.

३. अपंग व्यक्ती, (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ (१९९६ चा क्र.१) या अधिनियमातील कलम ३२ व ३३ नुसार जलसंपदा विभागाअंतर्गत गट अ आणि गट-ब मधील पदांना या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद केलेल्या सरळसेवेने भरण्यात येणाऱ्या पदांकरीता किमान ४० टक्के अपंगत्व असलेल्या अपंग व्यक्तीसाठी ३ टक्के आरक्षण लागू राहील.

४, महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत गट-अ आणि गट-ब साठी सरळसेवा भरतीने भरावयाच्या पदांकरीता अपंग उमेदवारांकरीता शारिरिक पात्रतेचे निकष सोबतच्या परिशिष्ट-अ प्रमाणे असतील. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून उमेदवारांची शिफारस प्राप्त झाल्यानंतर, अशा अपंग उमेदवारास शारिरिक पात्रतेसंदर्भात, संबंधित विषयाच्या तज्ञांचा समावेश असलेल्या वैद्यकीय मंडळाने प्रमाणित केल्यानंतरच, त्या अपंग व्यक्तींची शासन सेवेत संबंधित संवर्गात खाली दर्शविलेले निकष विचारात घेऊन नियुक्ती करण्यात येईल.

अ) संबंधित पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार अर्हताधारक असेल तर,

ब) त्या त्या संवर्गातील पदांची कर्तव्ये व जबाबदा-या लक्षात घेऊन त्या प्रमाणे वैद्यकीय मंडळाने सक्षम ठरविल्यास,

५. केंद्र शासनाच्या गट-अ व गट-ब यादीतील काही विशिष्ट पदे व त्या यादीमधील पदांव्यतीरिक्त जी पदे जलसंपदा विभागातंर्गत आस्थापनेवर आहेत अशा संवर्गातील पदांचे अपंगासाठी पदनिश्चिती करणेबाबतचे आदेश तज्ञ समितीच्या मान्यतेनंतर स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

६. वरील आदेश, मा. उच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने संदर्भ क्र.९ येथील शासन निर्णयान्वये प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०११०११३२१४७१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प. ग. पाटील)
शासनाचे उप सचिव

सहपत्र :- परिशिष्ट.

**प्रत :-** मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री / राज्यमंत्री, जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक,
सचिव (जसं) / सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे,
सर्व मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन, १६-अ, मंत्रालय, मुंबई.
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, सुधार-३, मंत्रालय, मुंबई.
सहसचिव (सेवा) / उप सचिव (प्रशासन) / उप सचिव (आस्था)
अवर सचिव (सेवा) / अवर सचिव (राकसे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
जलसंपदा विभागातील सर्व आस्थापना कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
आ (संनि) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. संकीर्ण १०१०/(६९/२०१०)/आ(संनि)**

**दिनांक : १३ .०१.२०११ चे सहपत्र.**

**परिशिष्ट - अ**

**गट-अ व ब संवर्गातील पदांवर सरळसेवेने भरती करण्यासाठी अपंग उमेदवारांसाठी अपंगत्व पात्रतेचे निकष.**

| अ.क्र. | पदनाम | शारिरीक योग्यता | सुयोग्य पदासाठी अपंगत्वाचा संवर्ग | कर्तव्य व जबाबदाऱ्या |
|---|---|---|---|---|
| (अ) | **स्थापत्य** | | | |
| **१** | सहायक कार्यकारी अभियंता गट-अ | S. ST.BN.W.SE.MF.C.R.W. | OA OL HH | जलसंपदा विभागांतर्गत उप विभागातील बांधकामाच्या व्यवस्थापनासाठी व त्यांच्या अंमलबजावणीसाठी जबाबदार |
| **२** | सहायक अभियंता श्रेणी-१ गट-अ | S. ST.BN.W.SE.MF.C.R.W. | OA OL HH | जलसंपदा विभागांतर्गत उप विभागातील बांधकामाच्या व्यवस्थापनासाठी व त्यांच्या अंमलबजावणीसाठी जबाबदार |
| **३** | सहायक अभियंता श्रेणी-२ गट-ब | ST.S.BN.W.SE | OA OL HH | अभियांत्रिकी संवर्गातील मूलभूत काम करण्याची जबाबदारी या पदावर काम करणाऱ्या अधिकाऱ्यावर असते. प्रकल्पाशी संबंधित संकल्पचित्रे / नकाशे व इतर कोणत्याही उदा. सिंचन व्यवस्थापन, संशोधन गुणनियत्रण, संकलित केलेल्या अभियांत्रिकी विषयक आकडेवारीचे विश्लेषण करणे इत्यादी कामे या अधिकाऱ्यांना करावी लागतात. |
| (ब) | **इतर** | | | |
| **४** | वरिष्ठ भू-वैज्ञानिक गट-अ | ST.S. SE BN. MF. W. KC. C | OA OL HH | सर्वेक्षण आणि संशोधन या बाबतच्या कामाकाजाचे प्रमुख म्हणुन त्यांची जबाबदारी असते क्षेत्रिय संशोधनाचे रिपोर्ट तयार करणे. ड्रीलींग ऑपरेशनच्या कामकाजावर देखरेख व नियत्रंण ठेवणे. खनिज क्षेत्राची पहाणी करणे इत्यादी |
| **५** | सहायक भू-वैज्ञानिक गट-ब | ST.S. SE BN. MF. W. KC. C | OA OL HH | क्षेत्रिय संशोधनाचे रिपोर्ट तयार करणे. खनिज क्षेत्राची पहाणी करुन अहवाल सादर करणे इत्यादी |

Abbreviations used -

OA - One Arm, OL - One Leg, HH - Hearing Handicapped

S-Sitting, ST- Standing, BN- Bending, W- Walking, SE-Seeing, MF –Manipulation by figures,
C- Communication, RW- Reading & Writing KC- Kneeling & Croutching